**केंद्र शासनाच्या “भांडवली गुंतवणुकीसाठी राज्यांना विशेष सहाय्य २०२३-२४” या योजनेच्या “भाग-४- नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये आर्थिक सुधारणा करुन त्यांना कर्जरोख्यासाठी पतपात्र बनवणे आणि कर्जरोखे जारी करणे” या योजनेंतर्गत निधी वितरीत करणेबाबत (Milestone-२).**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुरक-२०२३/प्र.क्र.९९/नवि-०४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २४ जुलै, २०२४.

**संदर्भ :-** १) नगर विकास विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि.२१.०३.२०२४.
२) वित्त विभाग, शासन पत्र क्र.संकीर्ण-२०२३ /प्र.क्र.९ /अर्थबळ, दिनांक २८.०३.२०२४.
३) नगर विकास विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि.३०.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या "भांडवली गुंतवणुकीसाठी राज्यांना विशेष सहाय्य २०२३-२४" या योजनेंतर्गत राज्य शासनाच्या भांडवली गुंतवणूक प्रकल्पांसाठी ५० वर्षांच्या बिनव्याजी कर्जाच्या स्वरूपात आर्थिक सहाय्य प्रदान करण्यात येत आहे. सदर योजनेच्या **“भाग-४- नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये आर्थिक सुधारणा करुन त्यांना कर्जरोख्यासाठी पतपात्र बनवणे आणि कर्जरोखे जारी करणे”** (Financing Reforms in Urban Local Bodies to make them creditworthy for Municipal Bonds and for issue of Municipal Bonds) अंतर्गत **Milestone-२ (मालमत्ता कराच्या दरात व वसूलीत सुधारणा करणे)** बाबत संदर्भ क्र.१ अन्वये रु.२०० कोटी निधी नगरपरिषद प्रशासन संचालनालयाच्या स्तरावर आहरित करण्यात आला आहे. संदर्भ क्र.२ अन्वये सदर निधीच्या विनियोगाबाबत वित्त विभागाने सूचना दिल्या आहेत. संदर्भ क्र.३ अन्वये आहरित निधीतून रू.७४.८७६ कोटी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत करण्यात आले आहेत. सदर आहरित निधीतील उर्वरित रक्कम संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

१. केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली खर्चासाठी विशेष सहाय्य २०२३-२४ या योजनेच्या **“भाग-४- नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये आर्थिक सुधारणा करुन त्यांना कर्जरोख्यासाठी पतपात्र बनवणे आणि कर्जरोखे जारी करणे”** अंतर्गत Milestone-२ **(मालमत्ता कराच्या दरात व वसूलीत सुधारणा करणे) साठी** केंद्र शासनाने उपलब्ध केलेल्या व सदर्भ क्र.१ अन्वये आहरित केलेल्या अनुदानातून **रक्कम रु.१२४.१२ कोटी** (रुपये एकशे चोविस कोटी बारा लक्ष फक्त) सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील रकाना क्र.८ मध्ये दर्शविल्यानुसार संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत करण्यात येत आहे.

२. नगरोत्थान महाअभियानांतर्गत शासनाने यापूर्वी मान्यता दिलेल्या पायाभूत प्रकल्पांतील राज्य हिश्याचा निधी म्हणून सदर विशेष अनुदान विनियोगात आणावे.
३. प्रस्तुत योजनेसंदर्भातील केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना तसेच नगरोत्थान महाअभियानाच्या मार्गदर्शक सूचना व कार्यपध्दतीनुसार खर्च करणे अनिवार्य राहील.
४. सदरचा निधी खर्च करून उपयोगिता प्रमाणपत्र तात्काळ सादर करण्यात यावे.
५. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयातील अन्य अटी व शर्ती कायम राहतील.
६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०७२४१६५१२४६६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHRIKANT CHANDRAKANT ANDGE

Digitally signed by SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
Date: 2024.07.25 13:06:19 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य,यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई.
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव ( नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.
८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, मुंबई / नागपुर
९. महालेखापाल, (लेखापरिक्षा)- १/२, मुंबई/ नागपुर
१०. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२. आयुक्त, नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड.
१३. मुख्याधिकारी, सातारा, कोरेगाव, भडगाव, वाडी, सेलू, मोहोळ, सांगोला नगरपरिषद
१४. कक्ष अधिकारी, नवि-३३, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती (नवि-०४)

शासन निर्णय क्रमांक :- पुरक-२०२३/प्र.क्र.९९/नवि-४ , दिनांक २४ जुलै, २०२४ सोबतचे विवरणपत्र

**नगरोत्थान महाअभियानातील प्रकल्प व वितरीत करण्यात येत असलेला निधी**

**(रु. कोटी)**

| अक्र | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव | प्रकल्पाचे नाव | प्रकल्प खर्च | राज्य हिस्सा | यापूर्वी वितरीत राज्य हिस्सा | शिल्लक राज्य हिस्सा | वितरीत करण्यात येत असलेला राज्य हिश्याचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | नांदेड महानगरपालिका | रस्ता | १०७.३२ | ७५.१२४ | २५.०४ | ५०.०८४ | २५.०० |
| २ | सातारा नगरपरिषद | रस्ता | २५.८७ | १९.४० | ६.४७ | १२.९३ | ६.००४ |
| ३ | कोरेगाव नगरपरिषद | पाणी पुरवठा | ५२.५४ | ४९.९१ | ०० | ४९.९१ | २० |
| ४ | भडगांव नगरपरिषद | भुयारी गटार | १२.६६ | ११.४० | ३.८० | ७.६० | २.०० |
| ५ | वाडी नगरपरिषद | मलनि:सारण प्रकल्प | १०४.७३ | ८९.०२ | २९.६८ | ५९.३४ | २५.०० |
| ६ | सेलू नगरपरिषद | रस्ता | ११५.५४ | ९८.२१ | ५३.२४ | ४४.९७ | २०.५० |
| ७ | सातारा नगरपरिषद | पाणी पुरवठा | ३४.३६ | २५.७७ | १६.५९ | ९.१८ | ८.०० |
| ८ | मोहोळ नगरपरिषद | पाणी पुरवठा | ४४.६८ | ४०.२१ | १३.४० | २६.८१ | १३.४० |
| ९ | सांगोला नगरपरिषद | भुयारी गटार | ९६.६३ | ८६.९६७ | ५.२२ | ८१.७४७ | ५.२२ |
| **एकूण** | | | | | | | **१२५.१२४** |

SHRIKANT CHANDRAKANT ANDGE

Digitally signed by SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
Date: 2024.07.25 13:05:57 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**